**व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातील २२०३ तंत्र शिक्षण या मुख्य लेखाशिर्षातंर्गत योजनेतील शासकीय संस्था व कार्यालयातील मंजूर झालेल्या पदांच्या आढाव्यांतर्गत निर्माण झालेले अतिरिक्त संचालकाचे १ पद व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (वरिष्ठ) चे २ पदे अशी ३ पदे वरिष्ठ पदावरुन कनिष्ठ पदात रुपांतर करण्याबाबत............**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**

शासन निर्णय क्रमांक : व्हीओसी-२०१०/प्र.क्र.८२/व्यशि-४,

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : ९ एप्रिल, २०१०.

संदर्भ : १. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.आयटीआय-१००४/(२४७/०४)/व्यशि-२, दिनांक : ३० सप्टेंबर, २००६

२. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.व्हीओसी/२१०५/(३९३/०५)/व्यशि-३, दिनांक : २५ जुलै, २००७.

३. संचालक (प्रशिक्षण) यांचे क्र.१०/आस्था/२००८/२४९, दिनांक : २० ऑक्टोंबर, २००८

४. वित्त विभाग, क्र.पदनि-१००९/प्र.क्र.१०३/२००९/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ५ जानेवारी, २०१० अन्वये दिनांक २९ डिसेंबर, २००९ रोजी झालेल्या बैठकीच इतिवृत्त.

**प्रस्तावना :-** लेखाशीर्ष २२३० अंतर्गत सहसंचालकांची २ पदे रु.१२०००-१६५००/- या वेतनश्रेणीत मंजूर आहेत. मात्र, २२०३ लेखाशीर्षांतर्गत अतिरिक्त संचालक (व्यवसाय शिक्षण) वेतनश्रेणी रुपये १४३००-१८३००/- हे १ पद मंजूर आहे. सबब संचालनालयाच्या दोन्ही लेखाशीर्षांतर्गत असलेल्या योजनेचे काम तसेच पदामधील रचना व पदामधील समतोल साधण्याकरिता आढाव्यात बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तसेच दिनांक २५ जुलै, २००७ रोजीच्या शासन निर्णयान्वये लेखाशीर्ष-२२०३ अंतर्गत पदांच्या आढाव्यामध्ये जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी या संवर्गातील एकूण ३१ पदांपैकी पुणे व अमरावती ही दोन पदे रु.१००००-१५२००/- या वेतनश्रेणीतून जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (वरिष्ठ) वेतनश्रेणी रु.१०६५०-१५८५०/- या वेतनश्रेणीमध्ये श्रेणीवाढ करण्यात आली होती. तथापि, या नवीन पदांची व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी या पदांची कर्तव्ये व जबाबदा-या आणि पदामधील एकसुत्रता असणे आवश्यक असल्याने या बाबी सर्व जिल्हयातील जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी ही पदे समान संवर्गात राहण्यासाठी जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (वरिष्ठ) पुणे व अमरावती ही नव्याने निर्माण केलेली पदे पुन:श्च मूळ संवर्गात रुपये १००००-१५२००/- या वेतनश्रेणीत समायोजित करण्याची बाबही शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत उच्चस्तर सचिव समितीचा दिनांक २९ डिसेंबर, २००९ रोजीच्या बैठकीत घेतलेला निर्णय विचारात घेऊन शासनाने आता पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय -** उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, दिनांक २५ जुलै, २००७ रोजीच्या शासन निर्णयान्वये पदाच्या आढाव्यांतर्गत लेखाशीर्ष-२२०३ अंतर्गत नव्याने निर्माण केलेले खालील वरीष्ठ पदे उच्चस्तर सचिव समितीच्या दिनांक २९ डिसेंबर, २००९ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार खालील प्रमाणे कनिष्ठ पदात रुपांतरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | कार्यालयाचे नांव | मूळ पदाचे पदनाम व वेतनश्रेणी व पदसंख्या | रुपांतरीत करावयाचे पदाचे पदनाम, वेतनश्रेणी व पद | रुपांतरीत केलेल्या पदांची संख्या | रुपांतरीत नंतर कनिष्ठ संवर्गातील एकूण मंजूर पदांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अतिरिक्त संचालक (१४३००-१८३००) १ पद | सहसंचालक (१२०००-१६५००) | १ पद | ८ |
| | | जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (वरिष्ठ) (१०६५०-१५८५०) २ पदे (अमरावती व पुणे) | जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (१००००-१५२००) | २ पदे | ३१ |

सदर शासन निर्णय उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३१३/०९/व्यय-५, दि.२३ मे, २००९ व क्र.३४१/०९/वि.सु.१, दिनांक ६ जून, २००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

हे आदेश राज्यशासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१००४०९१६५४२३१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

( शोभा वि. पत्की )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत :
संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई-१.
प्र.संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई-१.
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ, वांद्रे (पूर्व), मुंबई - ५१
सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय,
जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी कार्यालय, मुंबई
महालेखापाल - (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई-१/२, मुंबई/नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
निवासी लेखाधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/अमरावती
वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय,मुंबई
मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
सर्व व्यवसाय शिक्षण उपविभाग कार्यालये (उच्च व तंत्र शिक्षण विभाग)
निवड नस्ती (व्यशि-४)

D:\Patki\G.R\२-३.doc